चौदावा वित्त आयोग
(सन २०१५-२०२०)

**१४ व्या केंद्रिय वित्त आयोगांतर्गत राज्यातील ग्रामीण स्थानिक स्वराज्य संस्थांना जनरल बेसिक ग्रँटच्या वितरणाबाबतचे निकष व संनियंत्रण याबाबत मार्गदर्शक सूचना.**

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः चौविआ-२०१५/प्र.क्र. २६/ वित्त-४.**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
तारीख: १६ जुलै, २०१५.

**संदर्भ :**

१. केंद्र शासनाचे क्र.एफ १३(१)एफएफसी/एफसीडी/२०१५-१६, दि.३०/६/२०१५ चे पत्र.
२. शासन पत्र क्रमांकः चौविआ-२०१५/प्र.क्र.६४/वित्त -४, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक ६/७/२०१५.

**प्रस्तावना -**

१४ व्या केंद्रिय वित्त आयोगाच्या शिफारशीनुसार राज्यातील ग्रामीण स्थानिक स्वराज्य संस्थांना त्यांच्या बळकटीकरणासाठी अनुदान देण्यात येणार आहे. दिनांक १ एप्रिल,२०१५ पासून १४ व्या केंद्रिय वित्त आयोगास प्रारंभ झाला असून त्याचा कालखंड दि.१ एप्रिल, २०१५ ते दि.३१ मार्च, २०२० असा आहे.

चौदाव्या केंद्रिय वित्त आयोगांतर्गत केंद्र शासनाकडून राज्यातील ग्रामीण स्थानिक स्वराज्य संस्थांच्या बळकटीकरणासाठी प्राप्त होणारा निधी हा **केवळ ग्रामपंचायत स्तरासाठीच उपलब्ध करावयाचा आहे** .केंद्र शासनाने राज्यांसाठी निधी वितरीत करताना सदर निधीची परिगणना सन २०११ च्या जनगणनेनुसारची लोकसंख्या व क्षेत्रफळ या निकषांनुसार केली आहे. चौदाव्या केंद्रिय वित्त आयोगांतर्गत केंद्र शासनाकडून प्रस्तुत निधी **बेसिक ग्रँट व परफॉर्मन्स ग्रँट** या दोन प्रकारच्या ग्रँट्सच्या स्वरुपात प्राप्त होणार आहे. त्यापैकी जनरल बेसिक ग्रँट सन २०१५-१६ पासून प्राप्त होणार असून परफॉर्मन्स ग्रँट सन २०१६-१७ पासून प्राप्त होणार आहे. १४ व्या केंद्रिय वित्त आयोगांतर्गत राज्यातील ग्रामीण स्थानिक स्वराज्य संस्थांसाठी जनरल बेसिक ग्रँटच्या स्वरुपात प्राप्त होणारा निधी वितरीत करण्याबाबतचे निकष ठरविण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. शासन स्तरावर याबाबत विचारविनिमयानंतर खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे:-

## शासन निर्णय -

१४ व्या केंद्रिय वित्त आयोगांतर्गत ग्रामीण स्थानिक स्वराज्य संस्थांच्या बळकटीकरणाकरीता राज्याला सन २०१५-२०२० या कालखंडात **बेसिक ग्रँट व परफॉर्मन्स ग्रँट** या दोन प्रकारच्या ग्रँट्सच्या स्वरुपात राज्याला प्राप्त होणारा अपेक्षित निधी पुढीलप्रमाणे असेल.

**(रुपये कोटीत)**

| १४ वा वित्त आयोगाच्या अनुदानाचा प्रकार | सन २०१५-१६ | सन २०१६-१७ | सन २०१७-१८ | सन २०१८-१९ | सन २०१९-२० | एकूण |
|---|---|---|---|---|---|---|
| बेसिक ग्रँट | १६२३.३२ | २२४७.७७ | २५९७.१० | ३००४.३७ | ४०५९.५५ | **१३५३२.११** |
| परफॉर्मन्स ग्रँट | ०.०० | २९४.८४ | ३३३.६६ | ३७८.९१ | ४९६.१५ | **१५०३.५६** |
| **एकूण-** | **१६२३.३२** | **२५४२.६१** | **२९३०.७६** | **३३८३.२८** | **४५५५.७०** | **१५०३५.६७** |

### २.(अ) निधी वितरणाचे प्रमाण -

चौदाव्या केंद्रिय वित्त आयोगांतर्गत केंद्र शासनाकडून राज्यातील ग्रामीण स्थानिक स्वराज्य संस्थांच्या बळकटीकरणासाठी प्राप्त होणारा संपूर्ण निधी **हा केवळ ग्रामपंचायत स्तरासाठीच उपलब्ध असेल.**

### (ब) निधी वितरणाचे निकष -

**चौदाव्या केंद्रिय वित्त आयोगाच्या जनरल बेसिक ग्रँटच्या वाटपाचे निकष-**

| अ.क्र. | निकष | टक्केवारी |
|---|---|---|
| १ | जिल्ह्याची ग्रामीण लोकसंख्या (सन २०११ च्या जनगणनेनुसार ) | ९०% |
| २ | जिल्ह्याचे ग्रामीण क्षेत्रफळ. | १०% |
| | **एकूण** | **१००%** |

**(क)** १४ व्या केंद्रिय वित्त आयोगाचा निधी राज्य शासनाकडून जिल्हा परिषदांना (ग्रामपंचायत स्तरासाठी) वितरीत करण्यात येईल. **सदर निधीच्या विनियोगासंबंधी कार्यपध्दती विशद करणारा शासन निर्णय स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येत आहे. तरी असा शासन निर्णय निर्गमित होईपर्यंत सदर अनुदानातून कोणताही खर्च करण्यात येऊ नये.**

**(ड)** मुख्य कार्यकारी अधिकारी यांच्या बीम्स (BEAMS) वर निधी प्राप्त झाल्यानंतर जिल्हा परिषदांनी तो निधी तात्काळ कोषागारातून काढून संदर्भाधीन दि. ६ जुलै,२०१५ च्या पत्रान्वये दिलेल्या सूचनांनुसार १४ व्या केंद्रिय वित्त आयोगासाठी स्वतंत्रपणे उघडण्यात आलेल्या राष्ट्रीयकृत बँक खात्यात जमा करून घ्यावा.

**(इ)** १४ व्या केंद्रिय वित्त आयोगांतर्गत प्राप्त निधीच्या व्यवहारासाठी ग्रामपंचायतींनी राष्ट्रीयकृत बँकेत स्वतंत्र बँक खाते उघडण्याबाबत संदर्भाधीन शासन पत्र, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्र. चौविआ-२०१५/प्र.क्र.६४/ वित्त-४, दि.६/७/२०१५ अन्वये दिलेल्या सूचनांनुसार कार्यवाही करावी.

**(फ)** **तसेच १४ व्या केंद्रिय वित्त आयोगाच्या निधी वितरणाच्या निकषानुसार ग्रामपंचायत स्तरावर करावयाचे निधीचे वितरण, निधीच्या विनियोगाबाबतची मार्गदर्शक तत्वे, वितरित निधीमधून घ्यावयाची कामे या बाबी लक्षात घेऊन यासंदर्भातील सविस्तर मार्गदर्शक सूचना स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येत आहेत. तरी अशा मार्गदर्शक सूचना शासनाकडून निर्गमित झाल्यानंतरच त्यानुसार पुढील कार्यवाही करण्यात यावी. या सूचनांचे तंतोतंत पालन होईल याची दक्षता घ्यावी.**

**३.** सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी ह्या शासन निर्णयाच्या प्रती त्यांचे अधिनस्त सर्व जिल्हा परिषद/पंचायत समिती/ग्रामपंचायत स्तरावरील अधिका-यांना तात्काळ उपलब्ध करुन द्याव्यात.

**४.** सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने व अनौपचारिक संदर्भ क्र.९८/वित्त आयोग कक्ष, दि. १५/७/२०१५ नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

**५.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईट (www.maharashtra.gov.in) उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक संकेतांक क्र. २०१५०७१६१५४९२०८०२० असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने सांक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Vaibhav R Rajeghatge

Digitally signed by Vaibhav R Rajeghatge
DN: CN = Vaibhav R Rajeghatge, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Deputy Secretary
Reason: I am approving this document
Date: 2015.07.20 16:27:19 +05'30'

वैभव राजेघाटगे
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. सर्व जिल्हा परिषदांचे मा.अध्यक्ष,
२. महालेखापाल, महाराष्ट्र - १ (लेखापरीक्षा), मुंबई (पाच जादा प्रतीसह),
३. महालेखापाल, महाराष्ट्र - २ (लेखापरीक्षा), नागपूर (पाच जादा प्रतीसह),

४. मा. राज्यपालांचे सचिव,
५. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
६. सर्व विभागीय आयुक्त (महसूल)/सर्व उपायुक्त विकास,
७. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
८. सर्व सहसचिव/उपसचिव, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई,
९. मा.मंत्री (ग्रा.वि.) यांचे खाजगी सचिव,
१०.मा. राज्यमंत्री (ग्रा.वि.) यांचे खाजगी सचिव,
११.मा. मुख्य सचिव यांचे स्वीय सहाय्यक,
१२.अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग यांचे स्वीय सहायक,
१३.मा.प्रधान सचिव,वित्त विभाग यांचे स्वीय सहाय्यक,
१४.मा.प्रधान सचिव (ग्रा.वि. व पं.रा.) यांचे स्वीय सहाय्यक,
१५.मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई,
१६.सर्व सहमुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा (सर्व विभाग),
१७.सर्व जिल्हा परिषदांचे उपमुख्य कार्यकारी अधिकारी (पंचायत),
१८.सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी,
१९.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
२०.वित्त विभाग (व्यय-१५/अर्थोपाय / वित्त आयोग कक्ष),
२१.ग्राम विकास व जलसंधारण विभाग ( सर्व कार्यासने ),
२२.निवड नस्ती का.क्र.वित्त-४, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.